**मंत्रालयीन प्रशासकीय विभागातील व बृहन्मुंबईतील शासकीय कार्यालयातील उच्चश्रेणी लघुलेखक, निम्नश्रेणी लघुलेखक व लघुटंकलेखक या संवर्गातील सरळसेवा कोट्यातील पदे वित्त विभाग, शासन निर्णय, दिनांक ०२ जून, २०१५ च्या कमाल मर्यादेतून वगळण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन,**
**सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,**
**शासन निर्णय क्रमांक : एएससी १५१६/प्र.क्र.२०५ /१४-अ,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०३ फेब्रुवारी, २०१७

<u>वाचा</u> :- (१) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण २०१५/प्र.क्र.४१/अर्थ-१, दिनांक २.६.२०१५

(२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : एसआरव्ही २०१५/प्र.क्र.२९०/का.१२, दिनांक १६.७.२०१५

(३) सामान्य प्रशासन विभाग, पत्र क्र.एसआरव्ही २०१७/प्र.क्र.०१/का.१२, दिनांक ६.१.२०१७

<u>प्रस्तावना</u> :-

१ वित्त विभागाच्या दिनांक २.६.२०१५ च्या शासन निर्णयान्वये वेतनावरील खर्च नियंत्रित करण्याकरीता सरळसेवेच्या कोट्यातील रिक्त असणाऱ्या ५०% किंवा एकूण संवर्गाच्या ४% यापैकी जे कमी असेल इतकीच पदे भरण्यात यावीत असा निर्णय घेण्यात आला आहे.

२. सदर शासन निर्णयातील परिच्छेद ३ (ड) नुसार उर्वरित पदे भरण्यासाठी प्रधान सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, यांच्या अध्यक्षतेखालील समितीपुढे सध्या वेतनावर होणारा खर्च व त्यात होणारी संभाव्य वाढ यांचा आढावा घेऊन प्रस्ताव सादर करणे आवश्यक आहे असे नमूद करण्यात आले आहे.

३. वित्त विभाग, शासन निर्णय, दिनांक २.६.२०१५ मध्ये विहित केलेल्या टक्केवारीपेक्षा जास्त प्रमाणात रिक्त पदे भरण्याच्या प्रस्तावांवर निर्णय घेण्यासाठी सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दिनांक १६.७.२०१५ नुसार प्रधान सचिव (सेवा) यांच्या अध्यक्षतेखाली समिती स्थापन करण्यात आली आहे.

४. मंत्रालयीन प्रशासकीय विभाग व बृहन्मुंबईतील शासकीय कार्यालये यातील खालील तक्त्यात दर्शविलेल्या संवर्गातील सरळसेवा कोट्यातील पदे तातडीने भरणे आवश्यक असल्याने त्याबाबतचा प्रस्ताव प्रधान सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग यांच्या अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या समितीच्या दिनांक ०३.०१.२०१७ च्या बैठकीमध्ये सादर करण्यात आला.

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी (.रु) |
|---|---|---|
| १. | उच्चश्रेणी लघुलेखक , गट ब - अराजपत्रित | ९३००- ३४८०० + ग्रेड वेतन ४४०० |
| २. | निम्नश्रेणी लघुलेखक , गट ब - अराजपत्रित | ९३००-३४८००+ग्रेड वेतन ४३०० |
| ३. | लघुटंकलेखक गट क | ५२०० -२०२०० + ग्रेड वेतन २४०० |

५. समितीने दिलेल्या मान्यतेनुसार मंत्रालयीन प्रशासकीय विभाग व बृहन्मुंबईतील शासकीय कार्यालये यातील उपरोक्त तक्त्यात दर्शविलेल्या संवर्गातील सरळसेवा कोट्यातील पदे वित्त विभागाच्या दिनांक २.६.२०१५ च्या शासन निर्णयाच्या कमाल मर्यादेतून वगळण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

शासन असे आदेश देत आहे की, मंत्रालयीन प्रशासकीय विभाग व बृहन्मुंबईतील शासकीय कार्यालये यातील खालील तक्त्यात दर्शविलेल्या संवर्गातील सरळसेवा कोट्यातील पदे वित्त विभागाच्या दिनांक २.६.२०१५ च्या शासन निर्णयाच्या कमाल मर्यादेतून वगळण्यात येत असून तक्त्यातील रकाना क्र. ३ मध्ये दर्शविलेली सरळसेवा कोट्यातील रिक्त पदे भरण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदाचे नांव | समितीने पदे भरण्यास मान्यता दिलेली पदसंख्या |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| | **मंत्रालयीन प्रशासकीय विभाग** | |
| १. | उच्चश्रेणी लघुलेखक | १० |
| २. | निम्नश्रेणी लघुलेखक | २० |
| ३. | लघुटंकलेखक | १० |
| | **बृहन्मुंबईतील शासकीय कार्यालये** | |
| १. | उच्चश्रेणी लघुलेखक | २३ |
| २. | निम्नश्रेणी लघुलेखक | २५ |
| ३. | लघुटंकलेखक | १२ |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०२०३१७२८०३१६०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration, postalCode=400032, st=Andhra Pradesh, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2017.02.03 17:29:46 +05'30'

**(ग.भि. गुरव)**
शासनाचे अवर सचिव

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. सर्व विधानमंडळ सदस्य, विधानभवन, मुंबई
४. सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
५. सर्व मंत्रालयीन विभाग
६. सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने
७. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
८. महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई
९. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
११. बहुजन समाज पार्टी, डी-१, इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई
१२. भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ.बॅरेक क्र.१, नरिमन पॉईंट, मुंबई
१३. भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४ राजभवन, मुंबई ४
१४. भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई १
१५. इंडियन नॅशनल काँग्रेस, महाराष्ट्र प्रदेश काँग्रेस (आय) समिती, टिळक भवन, दादर, मुंबई २५
१६. राष्ट्रवादी काँग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरिमन पॉईंट, मुंबई २१
१७. शिवसेना, शिवसेना भवन, दादर, मुंबई २८
१८. उप सचिव (कार्यासन १२), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
१९. उप सचिव (कार्यासन वित्तीय सुधारणा), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०. निवड नस्ती (कार्यासन १४-अ)